मंत्रालयीन विभागातील वरिष्ठ स्वीय सहायक (राजपत्रित गट-अ ) व निवडश्रेणी लघुलेखक (राजपत्रित गट-ब) संवर्गातील लघुलेखकांच्या नियतकालिक बदल्यांचे प्राधिकार अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव (सेवा) यांच्याकडे सोपविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण १०१५/प्र.क्र.२७ /१५ /१४-अ**
मंत्रालय,हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२
तारीख: २६ फेब्रुवारी,२०१५

वाचा :- **महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ , दिनांक २५ मे, २००६**

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी तरतुद करण्याकरीता अधिनियम, २००५ दिनांक २५ मे २००६ अन्वये अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम -६ दुसरे परंतुकातील तरतुदीनुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील वरिष्ठ स्वीय सहायक (राजपत्रित गट-अ ) व निवडश्रेणी लघुलेखक (राजपत्रित गट-ब ) संवर्गातील बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होण्याऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ६ मधील दुसऱ्या परंतुकानुसार व कलम -७ नुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील वरिष्ठ स्वीय सहायक (राजपत्रित गट-अ ) व निवडश्रेणी

लघुलेखक (राजपत्रित गट-ब) संवर्गातील बदल्यांचे अधिकार खालील प्रमाणे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | गट-पदनाम | वेतनश्रेणी | सक्षम प्राधिकारी | बदली अधिकार प्रत्यार्पित करावयाचे अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | वरिष्ठ स्वीय सहायक गट-अ (मंत्रालयीन प्रशासकीय विभाग) | १५६००-३९१०० (ग्रेड पे-६६००) | मा.मुख्यमंत्री (सामान्य प्रशासन विभागाचे प्रभारी मंत्री) | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव (सेवा) |
| २ | निवडश्रेणी लघुलेखक गट-ब (मंत्रालयीन प्रशासकीय विभाग) | ९३००-३४८०० (ग्रेड पे-४६००) | मा.मुख्यमंत्री (सामान्य प्रशासन विभागाचे प्रभारी मंत्री) | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव (सेवा) |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२६१०१६१६२३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.02.26 12:25:01 +05'30'

**( डॉ.भगवान सहाय )**
अपर मुख्य सचिव (सेवा),महाराष्ट्र शासन

प्रति

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
४. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव
५. सर्व मंत्रालयीन विभाग
६. सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
७. निवडनस्ती (कार्यासन-१४-अ)